**अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी**
**<u>शासकीय वसतीगृह सुरु करण्याबाबत...</u>**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : आवगृ-२०१०/ प्र.क्र.१६४/का.१२**
मंत्रालय, विस्तार मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : ११ ऑगस्ट, २०१०.**

**<u>वाचा</u>** : शासन निर्णय, क्रमांक-शावगृ-२००६/प्र.क्र.६५/का.१२, दिनांक ६ डिसेंबर,२००७

**<u>शासन निर्णय</u>** : अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांकरिता उपरोक्त दि.६ डिसेंबर,२००७ च्या शासन निर्णयान्वये नवीन १४० शासकीय वसतीगृहे सुरु करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयानुसार मुंबई, जिल्हा मुंबई येथे ५०० क्षमतेचे मुलींचे वसतीगृह मंजूर करण्यात आले आहे.

२. सदर वसतीगृहासाठी अद्यापही मुंबई येथे शासकीय अथवा भाडेतत्वावर इमारत उपलब्ध होऊ शकलेली नाही. तसेच पनवेल येथे मोठया प्रमाणात अनुसूचित जमातीचे विद्यार्थी व्यावसायिक शिक्षण घेत आहेत. या ठिकाणी उपलब्ध असलेल्या शैक्षणिक संधी तसेच विद्यार्थ्यांची उपलब्धतता या बाबी लक्षात घेऊन उपरोक्त शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले मुंबई येथील मुलींचे ५०० क्षमतेचे वसतीगृह रद्द करून त्याऐवजी पनवेल, जि.रायगड या ठिकाणी मुलांचे ५०० क्षमतेचे वसतीगृह सन २०१०-११ या वर्षापासून सुरु करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

३. संदर्भाकित शासन निर्णयातील कर्मचारी आकृतीबंधाच्या प्रत्येक वसतीगृहनिहाय मजूर करण्यात आलेल्या पदांच्या संख्येच्या अधीन राहून सदर वसतीगृहासाठी आवश्यक पदे भरण्यास मंजूरी देण्यात येत आहे. संदर्भाकित शासन निर्णयातील उर्वरित इतर बाबी कायम राहतील व त्यांची अंमलबजावणी करण्यात यावी.

४. यासाठी येणारा खर्च "मागणी क्रमांक-टी-४, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- जनजाती क्षेत्र उपयोजना-०२- अनुसूचित जमातीचे कल्याण- २७७- शिक्षण (एक)- मागासवर्गीय मुलामुलींसाठी शासकीय वसतीगृहे सुरु करणे व त्यांचे परिरक्षण-(ए)-राज्य योजना (२२२५ १५५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००८१११४५८५३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अ.को. आहिरे )
कक्ष अधिकारी

**प्रति,**
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे

अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक .
जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन व विकास मंडळ, नाशिक .
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक .
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,पेण
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,गोरेगाव, मुंबई.
समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.
मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (व्यय-१४/अर्थ-३/ अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अधिकारी, का. ११, १३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का. १२)